**सन २०२४-२५ करीता हरित ऊर्जा निधी कार्यक्रम अंतर्गत रु.९.३७९२ कोटी इतका निधी महाऊर्जा कार्यालयास रोखीने वितरीत करणेबाबत. (मागणी क्र.के-६ लेखाशीर्ष क्र.२८१००१२३)**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक:बीयुडी-२०२४/प्र.क्र.११०/ऊर्जा-७.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ३१ मार्च, २०२५.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.अपाऊ-२००७/प्र.क्र.६९३/ऊर्जा-७, दि. १४.१०.२००८.
२. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र.पवन-२०१०/प्र.क्र.१३४/ऊर्जा-७, दि. १४.०७.२०१०.
३. शासन निर्णय, उ.ऊ.व कामगार विभाग, क्र.अपाऊ-२०१४/प्र.क्र.१४४/२०१४/ऊर्जा-७, दि.३०.०८.२०१४.
४. शासन निर्णय, उ.ऊ.का.व खनिकर्म विभाग, क्र.अपाऊ-२०२०/प्र.क्र.१३७/ऊर्जा-७, दिनांक ३१.१२.२०२०.
५. शासन निर्णय, उ.ऊ.का.व खनिकर्म विभाग, क्र.हहाधो-२०२३/प्र.क्र.२५५/ऊर्जा-७, दि.१७.१०.२०२३.
६. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०२४.
७. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४ व दि.१७.०३.२०२५.
८. शासन निर्णय, उ.ऊ.का.व खनिकर्म विभाग, क्र.बीयुडी-२०२४/प्र.क्र.११०/ऊर्जा-७, दि.१०.१०.२०२४.
९. महाऊर्जाचे पत्र क्र.लेखा/बीपी-०२०/हरित ऊर्जा निधी:२४-२५/२०२४-२५/७२१, १६०, दि.१२.०७.२०२४ व दिनांक १७.०२.२०२५.
१०. महाऊर्जा कार्यालयाचे पत्र क्र.पीजीएन/बीसीपी-१९२/२०२२-२३/२०२४/२८, दिनांक २७.०२.२०२५.

**प्रस्तावना:**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता "मागणी क्रमांक के-६, २८१० नवीन व नवीकरणीय ऊर्जा, (००)(०५) महाराष्ट्र ऊर्जा विकास निधीमधून भागविलेला खर्च (कार्यक्रम), ५०, इतर खर्च (२८१००१२३)" या लेखाशीर्षाखाली रुपये ५९४.३० कोटी इतकी सुधारीत तरतूद मंजूर करण्यात आली आहे. सदर सुधारीत तरतूदीमधून महाऊर्जा कार्यालयाच्या संदर्भाधिन क्र.९ व १० येथील प्रस्तावाच्या अनुषंगाने, अपारंपरिक ऊर्जा निर्मिती धोरण-२०२० अंतर्गत ऑनलाईन सिंगल विंडो पोर्टल विकसित करणे-रु.०.८८६२ कोटी, महाराष्ट्र हरित हायड्रोजन धोरण-२०२३ अंतर्गत महाऊर्जा कार्यालयात Project Management Unit स्थापन करणे-रु.०.१० कोटी आणि मे.सहकार शिरोमणी वसंतराव काळे सहकारी साखर कारखाना लि., चंद्रभागानगर, भाळवणी, ता.पंढरपूर, जि.सोलापूर-निष्कासन व्यवस्था खर्च परतावा-रु.२.०० कोटी, मे.राजारामबापू पाटील सहकारी साखर कारखाना लि., साखराळे, ता.वाळवा, जि.सांगली-निष्कासन व्यवस्था खर्च परतावा-रु.२.०० कोटी व भांडवली खर्च अनुदान-रु.१.०० कोटी, मे.जयवंत शुगर्स लि., धावरवाडी, ता.कराड, जि.सातारा-निष्कासन व्यवस्था खर्च परतावा-रु.०.३९३ कोटी व भांडवली खर्च अनुदान-रु.१.०० कोटी आणि मे.डॉ.बाबासाहेब आंबेडकर सहकारी साखर कारखाना, लि.अरविंदनगर, जि.धाराशिव-निष्कासन व्यवस्था खर्च परतावा-रु.२.०० कोटी असे एकूण रु.९.३७९२ कोटी इतका निधी महाऊर्जा यांना उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता मागणी क्र.के-६, लेखाशीर्ष क्र.२८१००१२३ खाली मंजूर सुधारीत अंदाजामधून अपारंपरिक ऊर्जा निर्मिती धोरण-२०२० अंतर्गत ऑनलाईन सिंगल विंडो पोर्टल विकसित

करणे-रु.०.८८६२ कोटी, महाराष्ट्र हरित हायड्रोजन धोरण-२०२३ अंतर्गत महाऊर्जामध्ये Project Management Unit स्थापन करणे-रु.०.१० कोटी आणि मे.सहकार शिरोमणी वसंतराव काळे सहकारी साखर कारखाना लि., चंद्रभागानगर, भाळवणी, ता.पंढरपूर, जि.सोलापूर-निष्कासन व्यवस्था खर्च परतावा-रु.२.०० कोटी, मे.राजारामबापू पाटील सहकारी साखर कारखाना, साखराळे, ता.वाळवा, जि.सांगली-निष्कासन व्यवस्था खर्च परतावा-रु.२.०० कोटी व भांडवली खर्च अनुदान-रु.१.०० कोटी, मे.जयवंत शुगर्स लि., धावरवाडी, ता.कराड, जि.सातारा-निष्कासन व्यवस्था खर्च परतावा-रु.०.३९३ कोटी व भांडवली खर्च अनुदान-रु.१.०० कोटी आणि मे.डॉ.बाबासाहेब आंबेडकर सहकारी साखर कारखाना, लि.अरविंदनगर, जि.धाराशिव-निष्कासन व्यवस्था खर्च परतावा-रु.२.०० कोटी असे एकूण रु.९.३७९२ कोटी इतका निधी महाऊर्जा यांस वितरीत करण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे. सदर निधी महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे यांना उपलब्ध करून देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम अदा करण्यासाठी श्री.नारायण श्री.कराड, सह सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व श्रीम.अंकिता बोऱ्हाडे, कार्यासन अधिकारी, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर निधी महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे (Director General, Maharashtra Energy Development Agency, Pune) यांच्या नावे अदा करण्यात यावा.

४. हरित ऊर्जा कार्यक्रम अंतर्गतच्या योजना/घटक/सहवीज निर्मिती प्रकल्पांसाठी खर्चाची उद्दिष्टे व प्रत्यक्ष साध्यता याबाबतच्या माहितीसह मासिक व त्रैमासिक अहवाल लगतच्या महिन्याच्या १० तारखेपर्यंत महाऊर्जा कार्यालयाने शासनास सादर करावा. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला निधी केवळ या शासन निर्णयामधील नमूद घटक/प्रकल्पांसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी खर्च करण्यात यावा. विहित कालावधीत सदर निधी कोणत्याही परिस्थितीत अखर्चित राहिल्यास त्याची संबंधितांवर जबाबदारी निश्चित करावी. मान्य व अनुज्ञेय काळात खर्च करण्याची जबाबदारी महासंचालक, महाऊर्जा यांची राहील. याबाबतचा त्रैमासिक अहवाल न चुकता सादर करण्याची जबाबदारी लेखाविषयक बाबी हाताळणाऱ्या सहायक/उप संचालक (लेखा) म्हणून कार्यभार पाहणाऱ्या अधिकाऱ्यांवर टाकण्यात यावी.

५. सदर निधीच्या लेख्यासंबंधीची कागदपत्रे, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, औंध रोड, स्पायसर कॉलेज समोर, पशुसंवर्धन आयुक्तालयाशेजारी, औंध, पुणे यांनी आवश्यक तेव्हा महालेखापाल, मुंबई, महाराष्ट्र-१ यांच्याकडे तपासणीसाठी सादर करावीत.

६. याबाबतचा खर्च "मागणी क्रमांक के-६, २८१० नवीन व नवीकरणीय ऊर्जा, (००)(०५) महाराष्ट्र ऊर्जा विकास निधीमधून भागविलेला खर्च (कार्यक्रम), ५०, इतर खर्च (२८१००१२३)" या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीमधून भागविण्यात यावा. मागणी क्र.के-६, लेखाशीर्ष क्र.२८१००१२३ मधून निधी वितरीत करण्यासाठी सादर करण्यात येणाऱ्या देयकाच्या अनुषंगाने प्रमाणित करण्यात येते की, सदर देयक सशर्त असून या लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक तसेच, उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही.

७. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी महासंचालक, महाऊर्जा, पुणे यांना निधी वितरीत करताना शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०२४ मधील आवश्यक त्या सूचना व अटींचे पालन करून तसेच, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५.०७.२०२४ व दिनांक १७.०३.२०२५ मधील तरतूदींनुसार व नियोजन विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.१४१/का-१४६१, दिनांक २१.०३.२०२५ व वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.११९/२०२५/व्यय-१६, दिनांक २७.०३.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३३११५३२०१९२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by JAYANT SHARAD SAGADE
Date: 2025.03.31 15:34:12 +05'30'

**( जयंत सागडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**,

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.सभापती/मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानपरिषद/विधानसभा यांचे सचिव, मुंबई,
३. मा.उप सभापती/मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानपरिषद/विधानसभा यांचे सचिव, मुंबई,
४. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा.उप मुख्यमंत्री (नगरविकास व गृहनिर्माण), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद/विधानसभा, विधानभवन, मुंबई,
८. मा.मंत्री (अपारंपरिक ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
९. मा.राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१०. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
११. सर्व विधानपरिषद/विधानसभा सदस्य, विधानभवन, मुंबई,
१२. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
१३. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. अपर मुख्य सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक, सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई,
१७. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
१८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१९. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनी मर्या.,मुंबई,
२०. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्या.,मुंबई,
२१. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई,
२२. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज पारेषण कंपनी मर्या.,मुंबई,
२३. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे,
२४. सह सचिव (ऊर्जा-७/३), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई,
२५. ऊर्जा उप विभागातील सर्व कार्यासने,उद्योग,ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई,
२६. निवड नस्ती/ऊर्जा-७.